**राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिपाई या १ (एक) अस्थायी पदाला मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.०३/परिवहन-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दि. ५ एप्रिल २०१७

वाचा :- १) शा.नि.गृह विभाग क्र. एमसीटी-२०१६/प्र.क्र. ०३/परि-५, दि. २१.१.२०१६
२) प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, मुंबई यांचे रापअन्या/आस्था /११/२०१६, दि. ०६.०२.२०१७ चे पत्र.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १० फेब्रुवारी २०१७

**प्रस्तावना :-**

राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयामधील १ (एक) अस्थायी पदाला संदर्भ क्र. १ नुसार दि. ०१ मार्च २०१६ ते २८ फेब्रुवारी २०१७ (१ वर्ष) पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर शिपाई या १ (एक) पदाची मुदत दि. २८ फेब्रुवारी २०१७ रोजी संपुष्टात येत आहे. प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आता शिपाई या १ (एक) अस्थायी पदाला मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास सादर केला असून सदरची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिपाई या १ (एक) अस्थायी पदास दि. ०१ मार्च २०१७ ते ३० सप्टेंबर २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे मे २०१७ आणि ऑगस्ट २०१७ अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच मार्च २०१६ रोजी प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के प्रलंबित दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी (तात्पुरती) पदे | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णयाचा क्र. व दिनांक. |
|---|---|---|---|
| १. | शिपाई | १ | Resolution No.MVA-1770/703(B)-XII,Sachivalaya, Bombay-32 Date-30th April, 1971 |
| | एकूण पदे | १ | |

२. राज्यातील मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांना शासन निर्णय गृह विभाग क्र. एमसीटी-०२०४/१७५५/सीआर-२१/परि-५, दि. २५ जून २००४ अन्वये वित्त विभाग, शासन निर्णय दि. १०.०९.२००१ च्या तरतूदीतून म्हणजेच पदाच्या आढावा घेण्यापासून वगळण्यात आले आहे. त्यामुळे पदांचा आढावा घेण्याची आवश्यकता नाही, मात्र नवीन पद निर्मितीस शासनाची मान्यता घ्यावी लागेल.

३. या बाबीवरील होणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनावरील कर, (००) ८००, इतर खर्च (००)(०२) राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण (२०४१ ०१३४)" या लेखाशिर्षाखालील सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु. क., दि. १० फेब्रुवारी २०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४०५११४८५४६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.04.05 11:50:34 +05'30'

(द. ह. कदम)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१. पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१ मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अवर सचिव (बीयुडी-१/परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ००५.
८. निवड नस्ती - परिवहन -५.